जिल्हा रुग्णालय, वाशिम येथील ६ अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः पदआ - २०१८ /प्र.क्र. २०४ /आरोग्य-३
१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: २२ जून, २०१८

वाचा -

1) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक -पदआ २०१८/प्र.क्र.७५/ आरोग्य -३, दिनांक- ०५.०४.२०१८.
2) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-३/टे-५अ/जिसारु वाशिमनवनिर्मित/अपदे/सन १८-१९/६८८४-८५/१८, दिनांक-१२.०६.२०१८.

शासन निर्णय-

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये जिल्हा रुग्णालय, वाशिम येथील ८१ अस्थाई पदांना दि.०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार जिल्हा रुग्णालय, वाशिम येथील मंजूर पदांपैकी नव्याने भरण्यात आलेल्या ०६ अस्थाई पदांना ते सदर पदावर कार्यरत झाल्याच्या दिनांकापासून ते दि.३०.०९.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१८-२०१९ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-आर-१
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
११०-२ - मुसफल क्षेत्रातील व दवाखाने
(०१)(०१) - मुसफल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये (२२१० ०१४६)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक दि. ०५.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२११५१०३१२११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.06.22 12:35:24 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवरसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर) मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, वाशिम
८. जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम.
९. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३)

शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक-पदआ-२०१८ /प्र.क्र. २०४ / आरोग्य-३,
विवरणपत्र.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी व ग्रेड पे (रुपये) | अस्थाई पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | मनोविकृती सामाजिक कार्यकर्ता | ९३००-३४८०० (ग्रेड पे ४३००) | १ |
| २ | वाहनचालक | ५२००-२०२०० (ग्रेड पे १९००) | १ |
| ३ | अपघात विभाग सेवक | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | १ |
| ४ | कक्षसेवक | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | १ |
| ५ | शिपाई | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | १ |
| ६ | बाह्यरुग्णसेवक | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | १ |
| **एकूण** | | | **६** |